**दुधखेडा ल.पा.योजना, ता.शहादा, जि.नंदुरबार विशेष दुरुस्तीच्या कामास अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता मिळणे बाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रमा २०१४/(५१९/१४)/ सिंव्य(कामे)**
मंत्रालय, मुंबई
तारीख: १२/०९/२०१४

<u>वाचा</u>

**कार्यकारी संचालक,तापी पाटबंधारे विकास महामंडळ,जळगाव यांचे पत्र क्रमांक पत्र क्र.मु अ / तापाविम / प्रशा-६/४२४४/सन २०१४,दिनांक ०१.०९.२०१४**

<u>प्रस्तावना</u>

दुधखेडा ता. शहादा जि. नंदुरबार ही ल. पा. योजना सन १९७२ साली पूर्ण झाली आहे. हया प्रकल्पाअंतर्गत ४.६६ कि.मी. लांबीच्या कालव्याव्दारे ३०२ हेक्टर क्षेत्रास सिंचनाचा लाभ होत आहे. या प्रकल्पास जवळपास ४० वर्षे झाल्याने कालवा व बांधकामे नादुरुस्त झाल्याने महाराष्ट्र जलक्षेत्र सुधार प्रकल्प अंतर्गत या योजनेचा समावेश करण्यात आलेला होता. परंतु कंत्राटदाराने सदर काम पूर्ण करण्यासाठी असमर्थता दर्शविल्यामुळे काम होऊ शकले नव्हते. सदर कामे न झाल्याने पूर्ण क्षमतेने पाण्याचा वापर होत नाही. सदर कामे झाल्यावर कालव्याची संकल्पीत सिंचन क्षमता निर्माण होईल व योजना पाणीवापर संस्थास हस्तांतरीत करण्यात येईल. या बाबींचा विचार करून प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाकडे विचाराधीन होता.

**शासन निर्णय**

या शासन निर्णयाव्दारे विस्तार सुधारणा अंतर्गत ४७०१ मोठे-मध्यम पाटबंधारे प्रकल्प (विस्तार व सुधारणा) दुधखेडा ल.पा.योजना, ता.शहादा, जि.नंदुरबार उर्वरित कामासाठीचे विशेष दुरुस्ती रु. ८१.५१ लक्ष (कामावरील खर्च रु ७३.३७ लक्ष व रु ८.१४ लक्ष अनुषंगिक खर्च) च्या खर्चास खालील अटीच्या अधीन राहुन सोबतच्या परिशिष्टा प्रमाणे प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे

१)दरसूची बाहय बाबीचे दर सक्षम स्तरावर मंजूरी घेऊन तांत्रिक मान्यता प्रस्तावात मंजुरी दयावी.

२) शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २००९/(४६५/०९)/मो.प्र-२, दि.१५.०१.२०१० मधील अटींच्या अधिन राहून कामांची दुरुस्ती करण्यात यावी .

३) सदरची कामे कार्यारंभ आदेश काढल्यापासून कामे पूर्ण होईपर्यत त्रैमासीक प्रगती अहवाल शासनास सादर करावा.

४) प्रकल्पाचे काम नियोजित वेळेत व प्रशासकीय मान्यतेच्या तरतूदीच्या मर्यादेत पुर्ण करण्यात यावे. ही कामे करण्याकरीता भौतिक व आर्थीक नियोजन करुन कार्यपूर्तेतीबाबत विविध टप्यांचे दिनांकासहीत (Mile Stones) निर्धारित करण्यात यावे. सदर दिनांकानुसार mile stone साध्य करणे अपेक्षित असून जर त्यात दिरंगाई झाल्यास दंड (Penalty) आकारण्याची व लवकर साध्य झाल्यास प्रोत्साहन (Incentive) देण्याची तरतूद निविदेमध्ये करण्यात यावी

५) यांत्रिकी संघटनेमार्फत करता येण्यासारखी विशेष दुरुस्तीचे काम यांत्रिकी संघटनेकडून करुन घेण्यात यावे.

६) बांधकामे संकल्पन संधानकाची ग्रेड योग्य निश्चित करुन कामात बचत साधावी.

७) काम पूर्ण झाल्यानंतर त्याचे पुर्णत्व अहवाल व प्रमाणपत्र (Completion Report & Certificate) शासनास सादर करावे

या कामावर होणारा खर्च ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्प यावरील भांडवली खर्च, (योजनांतर्गत) विस्तार व सुधारणा यासाठी भाग भांडवली अंशदान(१२ )(०३) गोदावरी पाटबंधारे विकास महामंडळास (४७०१ जे १८५) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्याखाली उपलब्ध होणाऱ्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिंव्य (कामे) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र ६२ सन २०१४-१५ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे.

हा शासन निर्णय (वित्त विभाग) क्र विअप्र १०.०८/प्रक्र ७०/२००८/विनियम, दि.१५.५.२००९ मधील भाग- पहिला उपविभाग -३ मधील अ.क्र.४( २७ (२) मध्ये विहित केल्यानुसार अनावर्ती खर्चाच्या बाबतीत रु ५.०० कोटीपर्यत प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार संबधित विभागास प्रदान केले आहेत. त्या अधिकारानुसार आंतर वित्तीय सल्लागाराच्या सहमतीने हे आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९१५१८१६०८३३२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjiv Arunkant Tatu

Digitally signed by Sanjiv Arunkant Tatu
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sanjiv Arunkant Tatu
Date: 2014.09.15 18:12:10 +05'30'

(सं.अ.टाटू)
शासनाचे उप सचिव

प्रत,

१. महालेखापाल १/२(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
२. महालेखापाल १/२(लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
३. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन,मुंबई
४. मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन,मुंबई
५. मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई

६. मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
७. स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम वगळून), मंत्रालय, मुंबई,
८. स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम), मंत्रालय, मुंबई,
९. स्वीय सहायक, मा. राज्यमंत्री, जलसंपदा, मंत्रालय, मुंबई,
१०.स्वीय सहायक, प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
११.स्वीय सहायक,प्रधान सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ,जळगाव
१३.मुख्य अभियंता(पा) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४.मुख्य अभियंता,(यांत्रिकी)जलसंपदा विभाग,नाशिक
१५. मुख्य अभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ,जळगाव
१६.आंतरवित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१७.माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१८.उप सचिव, (सिंव्य), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१९.अधीक्षक अभियंता व प्रशासक,लाक्षेविप्रा, जळगाव
.२०.अधीक्षक अभियंता, यांत्रिकी मंडळ पुणे १
.२१.अवर सचिव (सिंव्य/कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
.२२.कार्यकारी अभियंता,मुख्य व्दार उभारणी पथक क्र ५, नाशिक
.२३.उप अभियंता, सिंव्य(कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
.२४.ग्रंथालय, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,
.२५.सिंव्य(कामे)/कार्यासन, संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक प्रमा २०१४/(५१९/१४)/ सिंव्य(कामे) दिनांक:- १२ .०९.२०१४ चे प्रपत्र.

**परिशीष्ट**

| अ.क्र | लेखाशीर्ष | अंदाजीत खर्च (लक्ष रुपये ) |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १) | दुधखेडा कालव्याच्या पुर्नस्थापनेच्या कामाबाबत | ७३.३७ |
| (२ | अनुषंगिक खर्च | ८ .१४ |
| | एकूण | ८१.५१ |

Sanjiv Arunkant Tatu

Digitally signed by Sanjiv Arunkant Tatu
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sanjiv Arunkant Tatu
Date: 2014.09.15 18:12:36 +05'30'

(सं.अ.टाटू)
शासनाचे उप सचिव